जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी ०२२३/प्र.क्र.३२/कार्यासन ११**
पाचवा मजला, मुख्य इमारत,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २१ फेब्रुवारी, २०२३

वाचा: १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा,दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग,क्र.अस्थायी ०२२२/प्र.क्र.३४/कार्यासन ११, दि.८/९/२०२२
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.८/२/२०२३
४. जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांचे पत्र क्र.B-४/Admn/१५१/२०२३ , दि.६/१/२०२३

**प्रस्तावना :**

जिल्हा न्यायालय, धुळे यांच्या आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.१/९/२०२२ ते दि.२८/२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु,ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.१/३/२०२३ते दि. ३१/८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार जिल्हा न्यायालय, धुळे यांच्या आस्थापनेवरील ३१अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा न्यायालय, धुळे यांनी संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली ३१ अस्थायी पदे दि.१/३/२०२३ ते दि.३१/८/२०२३ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहायक अधिक्षक | ३ |
| २ | लघुलेखक (श्रेणी २ ) | १ |
| ३ | लघुलेखक (श्रेणी ३) | ८ |
| ४ | वरिष्ठ लिपिक | ३ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | ८ |
| ६ | बेलिफ | २ |
| ७ | वाहन चालक | १ |
| ८ | नाईक | १ |
| ९ | शिपाई | २ |
| १० | पहारेकरी | १ |
| ११ | सफाईकार | १ |
| **एकूण** | | **३१** |

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान,१०५ - दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२ ) (दत्तमत) (अनिवार्य)” या लेखाशीर्षांतर्गत ०१-वेतन या उद्दीष्टाखाली सन २०२३-२०२४ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क, दि.८/२/२०२३अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२७१९०५१४४११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2023.02.27 19:08:36 +05'30'

( **हेमांगी शेट्ये** )
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, धुळे,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे ,
६. विधि व न्याय विभाग, कार्या-२०/२३, मंत्रालय, मुंबई,
७. वित्त विभाग, व्यय ५ /आ.पु.कक्ष /अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती (कार्यासन ११).